ePCIS अंतर्गत तयार होणारे संगणकीकृत फेरफार नोंदवहीचा उतारा, परिशिष्ट अ, परिशिष्ट ब, नमुना ९ नोटीस व इतर संगणकीकृत तयार होणारे अभिलेख यांची नक्कल फी व सेवा केंद्रामार्फत द्यावयाच्या सेवांचे दर ठरविणेबाबत.

## महाराष्ट्र शासन

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-२०२३/प्र.क्र.०५/ल-१.**

पहिला मजला, मुख्य इमारत, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २८ मार्च २०२५.

**वाचा :-**

१. महसुल व वन विभाग, शासन निर्णय क्र. सीएलआर-२००१/प्र.क्र.४८/ल-१, दि.१३/११/२००१.
२. माहिति तंत्रज्ञान (सा.प्र.वि.) विभाग, शासन निर्णय क्र. मातंसं/नस्ती २०१०/प्र.क्र.३४/३९, दि.०९/०२/२०१५.
३. महसुल व वन विभाग, शासन निर्णय क्र. रा.भू.अ./२०१९/प्र.क्र.२८९/ल-१, दि.०२/०७/२०२०.
४. महसुल व वन विभाग, शासन निर्णय क्र. राभुअ-२०२१/प्र.क्र.२११/ल-१, दि. ०५/१२/२०२३.
५. जमाबंदी आयुक्त व संचालक भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र दि.२५.०६.२०२४.

**प्रस्तावना :-**

संगणकीकृत गाव नमुना नं. ७/१२ व मिळकतपत्रिका निवडक ८३ ठिकाणी उपलब्ध करुन देण्याबाबत शासनाने संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये निर्णय घेतला आहे व त्या ठिकाणी सदरचे संगणकीकृत उतारे मागणीप्रमाणे खातेदारांना उपलब्ध करुन देण्यासाठी सेतू केंद्राची उभारणी आणि त्या मार्फत देण्यात येणा-या अधिकार अभिलेखाच्या नक्कल फी बाबत निर्णय घेण्यात आला आहे. भूमि अभिलेख विभागाच्या सेवा तहसिल कार्यालयांमध्ये सुरु असलेल्या सेतू सेवा केंद्र / आपले सरकार सेवा केंद्र / महा ई-सेवा केंद्र यांच्यामार्फत देण्याची बाब आणि भूमि अभिलेख विभागातील उप अधिक्षक भूमि अभिलेख / नगर भूमापन अधिकारी यांचे कार्यालयात सेतू कार्यालयांच्या धर्तीवर सेतु सुविधा केंद्र सुरु करून सदर केंद्रामध्ये भूमि अभिलेखाच्या विभागाच्या सेवा उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

तहसिल कार्यालयांमध्ये सुरु असलेल्या सेतू सेवा कार्यालयांच्या धर्तीवर भूमि अभिलेख विभागातील उप अधिक्षक भूमि अभिलेख / नगर भूमापन अधिकारी यांचे कार्यालयात सेतु सुविधा केंद्र

स्थापन करण्यास आणि सदर केंद्रास "भू-प्रणाम केंद्र" या नावाने संबोधण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर केंद्रामार्फत माहिती तंत्रज्ञान विभागाकडून सेतू सेवा केंद्रासाठी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयामध्ये नमूद सर्व सेवाही देण्यात याव्यात.

२. भूमि अभिलेख विभागाच्या भू-प्रणाम केंद्रांमध्ये तसेच सेतू सेवा केंद्र / आपले सरकार सेवा केंद्र / महा ई-सेवा केंद्र या केंद्रांमध्ये संगणकीकृत मिळकतपत्रिका, मिळकत पत्रिकेत फेरफार, सर्व प्रकारच्या फेरफारांसाठी अर्ज, ई मोजणी VER. २ मधील सर्व प्रकारच्या मोजणी नकाशे, मिळकतीचा डिजीटली साईन्ड केलेले सर्व प्रकारचे नकाशे इत्यादी सेवा उपल्बध करून देण्यात येतील. त्यासाठी सदर सेवांचे दर निश्चित करण्यात येत आहेत.

**अ)** ePCIS प्रकल्पा अंतर्गत फेरफार नोंदवहीचा उतारा, परिशिष्ट अ, परिशिष्ट ब, नमुना ९ ची नोटीस, नमुना १२ ची नोटीस, अर्जाची पोच, रिजेक्शन पत्र, त्रुटी पत्र, निकाली पत्र, विवादग्रस्त नोंदवहीचा उतारा, सर्व प्रकारच्या अपील निर्णयाच्या प्रती व इतर संगणकीकृत अभिलेख इत्यादी अभिलेखांच्या नकलांसाठी खालील तक्त्यामध्ये नमुद दरास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अभिलेख | पहिल्या २ पृष्ठांसाठी दर* | विविध घटकांचा हिस्सा | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | राज्य शासन | ज. आ. आणि सं. भू. अ. यांचे स्विय प्रपंजी लेखा खाते | सेवा केंद्र चालक |
| १ | फेरफार नोंदवहीचा उतारा | रु.३५/- | रु.१०/- | रु.५/- | रु.२०/- |
| २ | परिशिष्ट अ | रु.३५/- | रु.१०/- | रु.५/- | रु.२०/- |
| ३ | परिशिष्ट ब | रु.३५/- | रु.१०/- | रु.५/- | रु.२०/- |
| ४ | नमुना ९ ची नोटीस | रु.३५/- | रु.१०/- | रु.५/- | रु.२०/- |
| ५ | नमुना १२ ची नोटीस | रु.३५/- | रु.१०/- | रु.५/- | रु.२०/- |
| ६ | अर्जाची पोच | रु.३५/- | रु.१०/- | रु.५/- | रु.२०/- |
| ७ | रिजेक्शन पत्र | रु.३५/- | रु.१०/- | रु.५/- | रु.२०/- |
| ८ | त्रुटी पत्र | रु.३५/- | रु.१०/- | रु.५/- | रु.२०/- |
| ९ | निकाली पत्र | रु.३५/- | रु.१०/- | रु.५/- | रु.२०/- |
| १० | विवादग्रस्त नोंदवहीचा उतारा | रु.३५/- | रु.१०/- | रु.५/- | रु.२०/- |
| ११ | अपील निर्णयाची प्रत | रु.३५/- | रु.१०/- | रु.५/- | रु.२०/- |
| १२ | १ ते ११ व्यतिरीक्त इतर ३०x२१ से.मी. आकाराचा उपलब्ध इतर अभिलेख | रु.३५/- | रु.१०/- | रु.५/- | रु.२०/- |
| *वर नमुद अभिलेखांच्या डिजीटली साईन केलेल्या नकला प्रिंट करुन जनतेस उपलब्ध करुन देण्यासाठी सेतू केंद्र/आपले सरकार सेवा केंद्र/ महा ई सेवा केंद्र/ भूप्रणाम केंद्र- यांना २ पेक्षा अधिक पृष्ठे असल्यास प्रती पृष्ठ रु. २/- (अधिक कर) एवढे सेवा शुल्क घेता येईल. | | | | | |

**ब) मिळकत पत्रिका :-**

संगणकीकृत व डिजीटल स्वाक्षरीत मिळकत पत्रिका खाली नमुद केलेल्या दरानुसार भू-प्रणाम केंद्र /सेतू सेवा केंद्र /आपले सरकार सेवा केंद्र / महा ई सेवा केंद्र यांचे मार्फत उपलब्ध करुन देणेस मान्यता देणेत येत आहे.

<table>
<tr><td rowspan="2">अ.क्र.</td><td rowspan="2">वितरणाचे ठिकाण</td><td colspan="3">क्षेत्र निहाय प्रती पुरवठा करण्याची फी (आकडे रुपयात) व त्यामधील विविध घटकांचा हिस्सा</td></tr>
<tr><td>महानगरपालिका क्षेत्र</td><td>अ, ब, क वर्ग नगरपालिका/नगरपंचायत</td><td>ग्रामीण क्षेत्र</td></tr>
<tr><td>१</td><td>महाभूमि संकेत स्थळावरुन प्राप्त डिजीटल मिळकत पत्रिका</td><td>रु.१५५/-</td><td>रु.११०/-</td><td>रु.६५/-</td></tr>
<tr><td rowspan="4">२</td><td colspan="4">विविध घटकांचा हिस्सा</td></tr>
<tr><td>१) महाराष्ट्र शासन</td><td>रु.९०/-</td><td>रु.६०/-</td><td>रु.३०/-</td></tr>
<tr><td>२) ज.आ.आणि सं.भू.अ. यांचे स्विय प्रपंजी लेखा खाते</td><td>रु.४५/-</td><td>रु.३०/-</td><td>रु.१५/-</td></tr>
<tr><td>३) सेवा केंद्र चालक</td><td>रु.२०/-</td><td>रु.२०/-</td><td>रु.२०/-</td></tr>
<tr><td colspan="5">भूप्रणाम केंद्र- /सेतू सेवा केंद्र / आपले सरकार सेवा केंद्र / महा ई सेवा केंद्र यांना पहिल्या दोन पृष्ठांसाठी रु.१५५/११०/६५/- अधिक सेवा शुल्क राहिल व दोन पेक्षा अतिरिक्त पृष्ठ असल्यास प्रती पृष्ठ रु.२/- (अधिक कर) प्रमाणे सेवा शुल्क केंद्र चालकास घेता येईल.</td></tr>
</table>

**क) ऑनलाईन अर्ज करणेची सुविधा :-**

महसूल विभागांतर्गत उपलब्ध असलेले अभिलेख प्राप्त करून घेण्यासाठी भू-प्रणाम केंद्र /सेतू सेवा केंद्र / आपले सरकार सेवा केंद्र/महा ई सेवा केंद्र यांचेमार्फत अर्ज सादर केल्यास त्यासाठी खालील प्रमाणे शुल्क निश्चित करण्यात येत आहेत.

<table>
<tr><td rowspan="2">अ.क्र.</td><td rowspan="2">अभिलेख</td><td rowspan="2">संबंधित पोर्टलवर अर्ज भरण्याच्या शुल्काची रक्कम (रू.)</td><td colspan="2">विविध घटकांचा हिस्सा</td></tr>
<tr><td>ज.आ.आणि सं.भू.अ. यांचे स्विय प्रपंजी लेखा खाते</td><td>सेवा केंद्र चालक</td></tr>
<tr><td>१</td><td>सर्व प्रकारचे फेरफार अर्ज</td><td>रु.२५/-</td><td>रु.५/-</td><td>रु.२०/-</td></tr>
<tr><td>२</td><td>सर्व प्रकारचे मोजणी अर्ज</td><td>रु.२५/-</td><td>रु.५/-</td><td>रु.२०/-</td></tr>
<tr><td colspan="5">तथापि, कोणत्याही खातेदार नागरीकाने वैयक्तिकरित्या सदर कागदपत्रे PDE (Public Data Entry) सुविधेवर अपलोड केल्यास किंवा ई मोजणी आज्ञावलीद्वारे ऑनलाईन अर्ज केल्यास सदर सेवा खातेदार नागरिकास निःशुल्क राहील.</td></tr>
</table>

**ड) नकाशे व स्कॅनिंग अभिलेख यांचे दर निश्चित करणे-**

ePCIS अंतर्गत स्कॅनिंग अभिलेख व संगणकीकृत नकाशाच्या प्रती जनतेस उपलब्ध करुन देण्याबाबत संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयाव्दारे घेण्यात आला आहे. सदर स्कॅनिंग अभिलेख व संगणकीकृत नकाशाच्या प्रती डिजीटल स्वाक्षरीने भू-प्रणाम केंद्र /सेतू केंद्र / आपले सरकार सेवा केंद्र / महा ई-सेवा केंद्रामार्फत खालीलप्रमाणे सेवा शुल्क आकारून जनतेस उपल्बध करून देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**i) स्कॅन अभिलेख :-**

| अ. क्र. | अभिलेखाचा प्रकार | निश्चित केलेले दर प्रती फाईल | विविध घटकांचा हिस्सा | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | राज्य शासन | ज.आ. आणि सं.भू.अ. यांचे स्विय प्रपंजी लेखा खाते | सेवा केंद्र चालक |
| १ | सॉफ्ट कॉपी स्वरूपात | रु.५०/- प्रती फाईल (JPG/PDF) | रु.२०/- | रु.१०/- | रु.२०/- |
| २ | मुद्रण/छापील स्वरूपात | पहिल्या दोन पृष्ठांसाठी रु.३५/-* | रु.१०/- | रु.५/- | रु.२०/- |
| *वर नमुद अभिलेखांच्या डिजीटली साईन केलेल्या नकला प्रिंट करुन जनतेस उपलब्ध करुन देण्यासाठी सेतू केंद्र/आपले सरकार सेवा केंद्र/ महा ई सेवा केंद्र/ भूप्रणाम केंद्र- यांना २ पेक्षा अधिक पृष्ठे असल्यास प्रती पृष्ठ रु. २/- (अधिक कर) एवढे सेवा शुल्क घेता येईल. | | | | | |

**ii) नकाशा :-**

डिजीटाईज नकाशाच्या नकला प्लॉटरव्दारे नकाशाच्या आकारमानानुसार उपलब्ध करून देण्यासाठी खालीलप्रमाणे शुल्क निश्चित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अभिलेखाचा प्रकार | रंगीत नकाशाचा आकार | निश्चित केलेले दर प्रती फाईल | विविध घटकांचा हिस्सा | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | राज्य शासन | ज.आ.आणि सं.भू.अ. यांचे स्विय प्रपंजी लेखा खाते | सेवा केंद्र चालक |
| १ | नकाशा | A0 | रु.२५५/- | रु.२०/- | रु.१०/- | रु.२२५/- |
| २ | | A१/A२ | रु.१५५/- | रु.२०/- | रु.१०/- | रु.१२५/- |
| ३ | | A३/A४ | रु.५०/- | रु.२०/- | रु.१०/- | रु.२०/- |

**३.** वरील सुविधा पुरविण्यासाठी सेतू केंद्र / आपले सरकार सेवा केंद्र / महा ई-सेवा केंद्र आणि भूमि अभिलेख कार्यालयातील भू-प्रणाम केंद्र चालकांनी सेवा पुरविण्याचे वरीलप्रमाणे शुल्क अधिक सेवा कराची रक्कम आकारावी.

**४.** वरील सर्व सेवा उपलब्ध करून देताना करावयाच्या प्रिंटसाठी वापरण्यात येणाऱ्या कागदाचा दर्जा ८० GSM पेक्षा कमी नसावा.

५. केंद्र चालकांकडून आकारण्यात येणाऱ्या सेवा शुल्काचे महसूल वाटप माहिती तंत्रज्ञान विभागाच्या प्रचलित धोरणानुसार असेल.

६. शुल्काची रकमेमध्ये क्युआर कोड व सोळा अंकी पडताळणी क्रमांकासह Digital sign डेटाबेस आधारीत संगणकीकृत अभिलेख दिनांक २३/११/२०२० च्या शासन परिपत्रकान्वये सर्व कायदेशीर व शासकीय कामकाजासाठी ग्राहय समजण्यात यावेत.

७. भूमि अभिलेख विभागाच्या www.mahabhumi.gov.in या संकेतस्थळावरून विनाशुल्क उपलब्ध होणारे, क्युआर कोड किंवा सोळा अंकी पडताळणी क्रमांकाविना असलेले आणि महाभूमिचा वॉटरमार्क असलेले विनास्वाक्षरीत अधिकार अभिलेख केवळ माहितीसाठी असून सदर अभिलेख कोणत्याही कायदेशीर व शासकीय कामकाजासाठी अवैध समजण्यात येतील. सदर विना स्वाक्षरीत अभिलेख कोणत्याही सेतू सेवा केंद्र / आपले सरकार सेवा केंद्र / महा ई सेवा केंद्र अथवा संग्राम सेवा चालक यांना त्यांच्या सही शिक्क्याने विक्री / वितरण करता येणार नाही. याबाबत सविस्तर सूचना माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या दिनांक १९/१२/२०१९ रोजीचे शासन परिपत्रकान्वये देण्यात आल्या आहेत.

८. भूमि अभिलेख विभागाच्या संकेतस्थळावरुन डिजीटल स्वाक्षरीने वितरीत होणा-या नकलेची नक्कल फी जमाबंदी आयुक्त यांचे स्वीय प्रपंजी लेखा खात्यात जमा होईल व प्रत्येक महिना अखेरीस प्राप्त नक्कल फी पैकी शासनाचा हिस्सा नक्कल फी व्यवस्थापन प्रणाली (Online Accounting System ) मधून प्राप्त अहवालाप्रमाणे GRAS प्रणालीद्वारे शासनाच्या विहित लेखा शीर्षाखाली जमा करणे आवश्यक राहील.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२८१४५५१८००१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY
RAGHUNATH
BANKAR

Digitally signed by SANJAY RAGHUNATH BANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C5917E56B0DA516AB259D846D516CB0584DCE5E9A2E73C0A35FA47BAB64E88AA, cn=SANJAY RAGHUNATH BANKAR
Date: 2025.03.28 14:56:30 +05'30'

**( संजय बनकर )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा. राज्यपालांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव.
३. मा. उप मुख्यमंत्री [नगरविकास, गृह निर्माण, सार्वजनिक बांधकाम (सा.उ.)] यांचे सचिव.
४. मा. उपमुख्यमंत्री (वित्त, नियोजन, राज्य उत्पादन शुल्क) यांचे सचिव.
५. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
६. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक.
७. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव.
८. जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.

९. सर्व विभागीय आयुक्त.
१०.महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर.
११.महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर.
१२.सर्व जिल्हाधिकारी.
१३.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१४.माहिती तंत्रज्ञान संचालनालय, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१६.सर्व मंत्रालयीन विभाग.
१७.निवडनस्ती/ल-१.